दिवसेंदिवस वाढत गेला अमेरिकेंत असल्यावेळीं त्यानीं लिहिलेल्या 'आर्यसमाज' नावाच्या पुस्तकात "डी. ए व्ही. कॉलेजाशीं माझा सबध जनकाचा असून गुरुकुलाशीं प्रियकराचा ( Lover ) आहे" असें स्पष्टपणें लिहून ठेवलें आहे. खरोखरच गुरुकुलाविषयीं लालाजींची अशीच भावना होती.

* * *

लालाजींच्या ठायीं जी ज्वलत देशभक्ति व असाधारण वक्तृत्वशक्ति वास करीत होती ती सहन करणें नोकरशाहीला शक्य नव्हतें लालाजी बोलू लागले कीं, पापाणहृदयेंसुद्धा पिघळून जात असत. त्याची देशभक्ति साथीच्या रोगासारखी सक्रामक असल्यामुळें नोकरशाहीच्या कारस्थानानीं त्रासून जाऊन त्याना अमेरिकेचा रस्ता धरावा लागला. अमेरिकेंत असल्या वेळीं त्याच्यात एक परिवर्तन घडून आलें वेदाविषयीं त्याचे विचार सदेहात्मक झाले.

अमेरिकेहून परत आल्यावेळीं आर्यसमाजानें आपल्या या महान् नेत्याचा अपूर्व सन्मान केला परंतु पुढें लौकरच लोकाना त्याच्या व्याख्यानात वेद हे ईश्वरीय ज्ञान आहेत याविषयीं त्याच्यांत उत्पन्न झालेल्या सदेहाचा वास येऊ लागला. गुरुकुलपक्षीय मुखपत्र 'प्रकाश'नें लालाजींच्या या परिवर्तनावर टीका केली. पुढें आर्यसमाजात याविषयींच्या चर्चेनें प्रचड स्वरूप धारण केलें. 'प्रकाश'चे संपादक माझे जिवलग मित्र आहेत आणि लालाजींवर माझी श्रद्धा होती, यामुळें या बाबतींत लालाजींना स्वत जाऊन भेटणें चागलें असें मला वाटलें. तदनुसार मी लाहोरास त्याच्या घरीं गेलों भेट होताच मी म्हणालों " वेद हे ईश्वरीय ज्ञान आहेत याविषयीं आपलें मत काय आहे ? "

लालाजींनीं लगेच याविषयींचे आपले विचार विस्तृतपणें सागितले तें ऐकून मी म्हणालों, "लालाजी, मला वाटतें वेद हे ईश्वरीय ज्ञान आहेत यावर जसा पाहिजे तसा आतां आपला विश्वास राहिलेला नाहीं, आता तो अविश्वासाच्या सीमेपर्यंत गेलेला नाहीं एवढेंच."

लालाजींनीं माझें म्हणणें कबूल केलें व मी काढलेल्या त्याच्या बोलण्याच्या निष्कर्षाची तारीफ केली लगेच मी नम्रपणें पण सल्ला देण्याच्या हेतूनें म्हणालों- " अशा स्थितींत आपणाला आर्यसमाजाचे सभासद राहता कामा नये. पण समाजावरील प्रेम मात्र कमी होऊ देऊ नये "

लालाजी सरळ स्वभावाचे होते त्याना माझें म्हणणें पटलें व त्यानीं समाजाच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला. त्यांच्या समतीनें आमच्यात झालेल्या या

सभापणाचा साराश मी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध केला व लालाजींचे विचार स्पष्ट झाले असल्यामुळें त्याच्यावर कोणाहि आर्यसमाजीयानें यापुढें टीका करण्याच्या भरीस पडू नये अशी सूचना दिली

पुढें आर्यसमाजाचे सभासद नसतानाहि ऋषि दयानदावरील त्याची असीम श्रद्धा कायम राहिली ते नेहमीं म्हणत कीं मी गुरुडमचा विरोधी असलों तरी ऋषि दयानदाना मी आपला गुरु मानतों ज्यावेळीं १९२५ सालीं महात्मा गाधींनीं ऋषि दयानदावर काहीं निराधार आक्षेप लादले त्या वेळीं त्या आक्षेपाविरुद्ध लालाजींनींसुद्धा जबरदस्त गर्जना केली, १९२७ सालीं सप्टेंबर महिन्यात दिल्ली शहरीं आर्य कॉंग्रेसचें जें भव्य अधिवेशन भरलें होतें त्या अधिवेशनातहि नगरकीर्तनाच्या अधिकाररक्षणाच्या प्रस्तावाचें लालाजींनीं जोरदार शब्दात समर्थन केलें, आणि स्वामी श्रद्धानदाच्या दिव्य बलिदानाच्या प्रसगीं आर्यसमाजाचें सात्वन करणें त्यानीं आपलें आद्य कर्तव्य मानलें.

* * * *

१९२१ सालीं पचविध बहिष्कारांची चळवळ जोरानें चाललेली होती. सुरवातीला लालाजी शाळा कॉलेजावरील बहिष्काराविरुद्ध होते परतु नागपूर कॉंग्रेसच्या वेळीं पजाबी लोकमतानें त्याना आपलें वैयक्तिक मत बाजूला ठेवण्यास भाग पाडलें नागपुराहून आल्यावर पहिल्यानें त्यानीं डी ए. व्ही कॉलेजावरच मारा सुरू केला डी ए. व्ही. कॉलेजाकरिता लालाजींचे श्रम लाला हसराजजींपेक्षा कोणत्याहि बाबतींत कमी नव्हते त्यानीं आपल्या आयुष्यातील ऐन उमेदाचा अधिकाश काल कॉलेजाच्या सेवेंत घालविलेला होता. ज्या कॉलेजाकरिता त्यानीं आपली शक्ति व धन खर्ची घातलीं होतीं तेंच कॉलेज आता ते बद पाडण्याच्या प्रयत्नास लागले. लालाजींच्या चळवळीनें पहिल्या प्रथम डी. ए व्ही. कॉलेजात हडताळ पडला व नतर इतर अनेक प्रमुख कॉलेजात पडला.

याच दिवसात लालाजींच्या प्रयत्नानें लाहोर शहरीं कौमी महाविद्यालयाची स्थापना झाली. याच्या मुख्य सस्थापकात लालाजी व भाई परमानद होते या विद्यापीठाच्या शिक्षणसमितीचा (Board of Education) मीहि सभासद होतों. बोर्डाच्या एका सभेत कौमी महाविद्यालयाऐवजीं राष्ट्रीय महाविद्यालय असें नाव ठेवण्यात यावें अशा अर्थाचा मी एक ठराव आणला. परतु भाई परमानदानीं—जे आजकाल मुसलमानांचे कट्टे विरोधी बनले आहेत—नावात एक तरी मुसलमानी

शब्द असणें अवश्य आहे अशा युक्तिवादावर त्याचा विरोध केला. यावर कौमी शब्दाशीं 'मुसलमानांचा कांहीं संबंध नाहीं, तो शब्द फार्शी किंवा अरबी आहे' असें मी उत्तर दिलें. लालाजींनींसुद्धां माझ्या ठरावाला अनुमोदन दिलें; परंतु त्या कालीं बोर्डाच्या सभासदांत भाई परमानंदांचें अति प्रस्थ असल्यामुळें माझा ठराव पास होऊं शकला नाहीं.

या कौमी महाविद्यालयानें आपल्या स्नातकांना (Graduates) बी. ए. पदवी देण्याचें ठरविलें होतें. यामुळें महाविद्यालयानें स्वभाषेंत पदव्या देणें योग्य आहे असा एक ठराव मी आणला. याचेंहि लालाजींनीं समर्थन केलें. परंतु एवढ्यानेंहि हा ठराव पास होऊं शकला नाहीं. कारण बोर्डाच्या सभासदांना दास्यवृत्तीनें इतकें भारून टाकलेलें होतें कीं स्वभाषेंत पदव्या देणें त्यांचें त्यांनाच हास्यास्पद वाटत होतें.

लालाजींत असीम गुण होते व या अमोल असीम गुणांमुळेंच 'पंजाबकेसरी' ही पदवी त्यांना लाभली.



—प्रो. रामदेव, आचार्य, गुरुकुल कांगडी.
(पंजाब केसरी, लाला लजपतराय, विशेषांक, १९३०)



## लाला लजपतराय यांचें वाङ्मय.

### उर्दु.

(१) तवारिख-इ-हिंद (भा. १)
(२) महाराज शिवाजी.
(३) महाराज अशोक.
(४) मॅझिनी.
(५) गॅरिबाल्डी.
(६) स्वामी दयानंद सरस्वती.
(७) भगवान श्रीकृष्ण.

### इंग्रजी.

(1) Young India.
(2) The United States of America.
(3) England's Debt to India.
(4) Arya Samaj.
(5) Political Future of India.
(6) The Evolution of Japan.
(7) The Problem of National Education in India.
(8) Unhappy India.
(9) India's Will to Freedom.

